# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्पीय) अधिवेशन, २०२३

---

**अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी**

**प्रश्नांची एकूण संख्या - २०**

---

### शासन परिपत्रकानुसार शिक्षकांना पाच दिवसाचा आठवडा करण्याबाबत

**(१) ३३४८ (०२-०६-२०२०) श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना पाच दिवसाचा आठवडा करून शिक्षकांना त्यातून वगळण्यात आल्याने शिक्षक भारती संघटनेने शाळांना ५ दिवसाचा आठवडा करण्याची मागणी माहे एप्रिल, २०२० मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शिक्षण संचालक आणि शिक्षण सचिव यांनी मान्यता देऊनही राज्यातील शाळांना अद्यापी पाच दिवसांचा आठवडा करण्याबाबत अंमलबजावणी झाली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षकांना पाच दिवसाचा आठवडा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) होय.
(२) राज्यातील शाळांना पाच दिवसांचा आठवडा करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन नाही. अशा मागणीच्या अनुषंगाने शासनाने मान्यता दिलेली नाही. तसेच शिक्षण संचालक/ सचिव यांनी अशी मान्यता दिलेली नाही.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

### शिक्षक सेवकांच्या मानधनात वाढ करण्याबाबत

**(२) ३४१४ (०२-०६-२०२०) श्री.किशोर दराडे : तारांकित प्रश्न क्रमांक १२४५ ला दिनांक १३ मार्च, २०२० रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शिक्षक सेवकांचे मानधन सुरुवातीला रुपये ३,०००/-, माध्यमिक शिक्षकांचे रुपये ४,०००/- व उच्च माध्यमिक शिक्षकांचे रुपये ५,०००/- असून सन २०१२ नंतर प्राथमिक शिक्षक रुपये ६,०००/-, माध्यमिक शिक्षकांना रुपये ६,०००/- तसेच उच्च माध्यमिक शिक्षकांना रुपये १२,०००/- मानधन देण्यात आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सातवा वेतन आयोग लागू झाल्यानंतर वाढती महागाई लक्षात घेता सदर मानधनात वाढ करुन शिक्षक सेवकांची योजना रद्द करून सहायक शिक्षकाची पद भरती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) शिक्षण सेवकांची योजना रद्द करून सहाय्यक शिक्षकांची पदभरती करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या अनुकंपा तत्वावरील भरतीबाबत

**(३) ३८७३ (१७-०७-२०२०) श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या अनुकंपा तत्वावरील भरती करण्याबाबत शिक्षक भारती आणि विविध संघटना यांनी माहे एप्रिल, २०२० मध्ये वा त्यादरम्यान मागणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (०७-१२-२०२२) :** (१) होय हे खरे आहे.
(२) राज्यातील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या अनुकंपा तत्वावरील भरतीसंदर्भात वित्त विभाग व सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने सुयोग्य सुधारणा करण्याची कार्यवाही सुरू आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोरोनाचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शिक्षकांना दिलेल्या कामांबाबत

**(४) ३८९४ (२०-०८-२०२०) डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोरोनाचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी डॉक्टर, पोलीस यांच्याबरोबर शिक्षकांनाही सर्वेक्षणापासून ते नाकाबंदीपर्यंतची कामे देण्यात आली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू कामे देताना शिक्षकांना कोणत्याही प्रकारची सुविधा, प्रशिक्षण देण्यात आले नसल्याची तक्रार एका शिक्षकाने केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१), (२) व (३) कोरोना महामारीच्या जागतिक संकटकाळात राज्यातील सर्वच शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे शिक्षकांनादेखील आवश्यकतेनुसार वेगवेगळी कामे देण्यात आली होती. अशा आपत्कालिन परिस्थितीत राष्ट्रीय कर्तव्य म्हणून या जबाबदाऱ्या पार पाडणे अपेक्षित आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या रिक्त पदांबाबत

**(५) ४८८३ (१३-१२-२०२०) श्री.विक्रम काळे, श्री.शशिकांत शिंदे, श्री.अमोल मिटकरी, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची माहे जून, २०२० अखेरपर्यंत एकूण किती पदे रिक्त आहेत, तसेच रिक्त पदे भरुन विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान टाळण्यासाठी शासनाने कोणती उपाययोजना केली आहे,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या आकृतिबंधाबाबत नेमलेल्या समितीने दिलेल्या अहवालावर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) राज्यातील प्राथमिक शाळेत युडायस डा.टा. सन २०१९-२०२० नुसार सुमारे २२,०४२ प्राथमिक शिक्षक पदे रिक्त आहेत. राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची रिक्त पदे भरण्याबाबतची बंदीस वित्त विभागाने शिथिलता दिली आहे. त्यानुसार शालेय शिक्षण विभागांतर्गत पदभरतीस वित्त विभागाची मान्यता घेण्याची कार्यवाही सुरु आहे.
(२) शासन निर्णय क्रमांक एसएसएन-२०५/प्र.क्र.१२/टीएनटी-२ दिनांक २८/०१/२०१९ अन्वये राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अंशत: अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांसाठी शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी सुधारित आकृतिबंध लागू करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अनेक शाळांमध्ये लिपिक व अन्य शिक्षकेतर पदे रिक्त असल्याबाबत

**(६) ९४३७ (२०-०७-२०२१) ॲड.निरंजन डावखरे, श्री.प्रविण दरेकर, श्री.प्रसाद लाड, श्री.जयंत आसगावकर, श्री.किरण सरनाईक, श्री.कपिल पाटील, श्री.विक्रम काळे : दिनांक ६ जुलै, २०२१ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक २ मधील प्रश्न क्रमांक ७०७८ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनेक शाळांमध्ये मागील २० वर्षांपासून लिपिक भरती राबविण्यात आली नसल्याने अनेक शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातील लिपिक व अन्य शिक्षकेतर पदे रिक्त असल्याचे माहे मे, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून संचालक (शिक्षण), माध्यमिक व उच्च माध्यमिक यांनी नवीन आकृतिबंधाप्रमाणे सदरहू पदे अनुज्ञेय ठरविली असून त्याच्या याद्याही शिक्षणाधिकाऱ्यांनी प्रसिध्द केल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मागील पाच वर्षामध्ये अनेक शिक्षक सेवानिवृत्त झाले तर काही शिक्षक मृत्यू पावले असल्यामुळे विषय शिक्षकांची पदे रिक्त असल्याने विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होत असल्यामुळे शिक्षक भरतीवरची बंदी आणि चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांची भरती बंदी उठवण्याबाबतची मागणी होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार सदरील रिक्त जागा भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच, राज्यातील शाळांमध्ये दिनांक ३१ मार्च, २०२१ अखेर रिक्त असलेल्या सर्व प्रकारच्या एकूण शिक्षकांची संख्या किती,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) होय, हे खरे आहे. राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची रिक्त पदे भरण्याबाबतची बंदी उठविण्यास वित्त विभागाची मान्यता घेण्याची कार्यवाही सुरु आहे.
शासन निर्णय दिनांक ११/१२/२०२० अन्वये सर्व खाजगी अनुदानित/अंशत: अनुदानित माध्यमिक/उच्च माध्यमिक शाळांतील चतुर्थ श्रेणी कर्मचाऱ्यांसाठी ठोक स्वरूपात शिपाई भत्ता देण्याची तरतूद करण्यात आली आहे.
शिक्षक अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणी परीक्षा (TAIT) २०२२ चे आयोजन IBPS कंपनीमार्फत घेण्याच्या सूचना दिनांक ०७/११/२०२२ अन्वये आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य पुणे यांना दिल्या आहेत.
(३) राज्यातील माध्यमिक व उच्च माध्यमिक अनुदानित व विनाअनुदानित शाळेतील यू डायस डाटानुसार घेतलेल्या माहितीनुसार एकूण २३,४३२ शिक्षकांची पदे रिक्त आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात शिक्षण क्षेत्रातील प्रलंबित मागण्या पूर्ण करण्याबाबत

**(७) १०२४४ (०२-१०-२०२१) श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात शिक्षण क्षेत्रातील सुमारे ३१ प्रलंबित मागण्यासंदर्भात शासनाचे लक्ष वेधण्यासाठी महाराष्ट्र राज्य शिक्षक परिषदेच्यावतीने दिनांक ५ जुलै, २०२१ रोजी वा त्यासुमारास एक दिवसीय राज्यव्यापी आंदोलन करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शिक्षण क्षेत्रातील प्रलंबित मागण्या पूर्ण करण्यासाठी लोकप्रतिनिधी व संघटनेमार्फत पाठपुरावा करुनही दखल न घेतल्याने आंदोलन करण्यात आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी सेवेत रुजू झालेल्या कर्मचाऱ्यांना विनाविलंब पूर्वलक्षी प्रभावाने जुनी पेन्शन योजना लागू करण्यात यावी, दिनांक १ नोव्हेंबर, २००५ नंतर सेवेत रुजू झालेल्या शिक्षक कर्मचाऱ्यांना शिक्षण कायदा १९७७-१९७८ नुसार लागू झालेले सेवाशर्ती नियमानुसार सन १९८१ मधील नियम १९ व २० नुसार जुनी पेन्शन योजना व भविष्य निर्वाह निधी योजना पूर्ववत लागू करावी, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दहा, वीस, तीस वर्षे सेवेनंतर आश्वासित प्रगती योजना लागू करावी यासह ३१ मागण्यां शासनाकडे प्रलंबित आहेत, हे खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू ३१ प्रलंबित मागण्या पूर्ण करण्याकरीता कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१६-०१-२०२३) :** (१) व (२) शिक्षण संचालनालयास निवेदन अप्राप्त आहे.

(३), (४) व (५) वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक ३१/१०/२००५ नुसार दिनांक ०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर शासकीय सेवेत नियुक्त होणाऱ्या सर्व शासकीय कर्मचाऱ्यांना परिभाषित अंशदायी निवृत्ती वेतन योजना लागू करण्यात आली.त्या अनुषंगाने शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक २९/११/२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये याबाबतची कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णय आव्हानित केल्यानंतर मा.उच्च न्यायालयाच्या पूर्णपीठाने दिनांक ३०/०४/२०१९ रोजी मार्गदर्शनपर निर्णय दिला असून उक्त शासन निर्णय न्यायोचित ठरविले आहे.

शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दहा, वीस, तीस वर्षे सेवेनंतर आश्वासित प्रगती योजना लागू करण्याच्या अनुषंगाने वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात येत आहे.

---

## कळंब (जि.उस्मानाबाद) तालुक्यातील देवळाली येथील जागृती विद्यामंदिर शिक्षण संस्थेच्या पदाधिकाऱ्याने शिक्षकाची फसवणूक केल्याबाबत

**(८) १३२९४ (०६-०४-२०२२) श्री.सुनिल शिंदे, श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कळंब (जि.उस्मानाबाद) तालुक्यातील देवळाली येथील जागृती विद्यामंदिर शिक्षण संस्थेच्या पदाधिकाऱ्याने गावातील एका निरक्षर व्यक्तीस ‘शिपाई’ पदी नियुक्ती केल्याचे दर्शवून त्याचे मागील सुमारे पाच वर्षांचे वेतन स्वत: वापरले असल्याचे दिनांक १८ जानेवारी, २०२२ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आहे, तद्नुसार सदर प्रकरणातील दोषी व्यक्तींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर प्रकरणी शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी दिनांक ३१/१२/२०२१ रोजी शाळेस भेट देऊन केलेला चौकशीचा अहवाल शिक्षण उपसंचालक, लातूर यांना सादर केला. त्यावर शिक्षण उपसंचालक, लातूर यांनी दिनांक ०३/०३/२०२२ रोजी घेतलेल्या अंतिम सुनावणीस श्री.राऊत (सेवक) यांची वैयक्तिक

मान्यता रद्द करण्याबाबत निर्णय घेतला. त्यानुसार संबंधित संस्था अध्यक्ष, सचिव व मुख्याध्यापक यांनी कार्यवाही न केल्याने शिक्षणाधिकारी यांनी दिनांक १२/०५/२०२२ अन्वये शिक्षण उपसंचालक यांच्याकडे श्री.जाधवर यांना मुख्याध्यापक म्हणून पदोन्नतीस दिलेली मान्यता रद्द करण्याबाबत शिफारस केली.

शिक्षण उपसंचालक यांनी प्रस्तुत प्रकरणी श्रीमती जाधवर यांचे मुख्याध्यापक पद रद्द करण्याबाबत निर्णय दिला आहे. याअनुषंगाने श्रीमती जाधवर यांनी मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.८०१४/२०२२ दाखल केली आहे. प्रस्तुत प्रकरण सद्य:स्थितीत न्यायप्रविष्ट आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वाशिम शहरातील पोलीस वसाहतीचे काम पूर्ण झाले असून त्याचे उद्‌घाटन करून पोलीस कर्मचाऱ्यांना ती घरे तात्काळ देण्याबाबत

**(९) १३६७७ (२५-०८-२०२२) श्री.किरण सरनाईक :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाशिम शहरातील पोलीस वसाहतीचे काम पूर्ण झाले असूनही त्याचे उद्घाटन न झाल्याने पोलीस कर्मचाऱ्यांना ती घरे देण्यात न आल्याची बाब माहे मे, २०२२ च्या पहिल्या सप्ताहात निदर्शनास आली हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,चौकशीच्या अनुषंगाने वाशिम शहरातील पोलीस वसाहतीचे काम पूर्ण झाले असून त्याचे उद्घाटन करून पोलीस कर्मचाऱ्यांना ती घरे तात्काळ देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०२-०२-२०२३) :** (१) व (२) नवीन पोलीस मुख्यालय, वाशिम येथे २०० शासकीय निवासस्थानाचे बांधकाम पूर्ण करण्यात आलेले असून सदर बांधकामाची अपर पोलीस अधीक्षक याच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय समितीमार्फत पाहणी करण्यात आली. सदर समितीने बांधकामामध्ये काही त्रुटीविषयी अहवाल सादर केला असल्याने सदरच्या कामामध्ये असलेल्या त्रुटीची पुर्तता करण्याबाबत कळविण्यात आलेले आहे. सदर अपूर्ण कामांची पुर्तता झाल्यावर पोलीस अधीक्षक, वाशिम, सदर वसाहतीचा ताबा घेणार असून पुढील कारवाई चालु आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्य शासनाच्या विविध विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१०) १३८८० (२५-०८-२०२२) श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे, श्री.अमोल मिटकरी, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.प्रवीण दटके, श्री.प्रविण दरेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामदास आंबटकर, श्री.रमेशदादा पाटील, श्री.अरुण लाड : तारांकित प्रश्न क्रमांक १२७६२ ला दिनांक ५ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासकीय कर्मचाऱ्यांची गृह, सार्वजनिक आरोग्य विभागासह विविध विभागातील विविध संवर्गातील व स्थानिक स्वराज्य संस्थाच्या कर्मचाऱ्यांची २४४४०५ पदे रिक्त असल्याचे माहे डिसेंबर, २०२० च्या अहवालातून निदर्शनास आले असून त्यापैकी सार्वजनिक आरोग्य विभागात २३११२, शालेय शिक्षण विभागात ३८२८ व वैद्यकीय शिक्षण विभागात १२४२३ इतकी पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्य शासकीय कार्यालय आणि जिल्हा परिषदेतील अधिकारी कर्मचाऱ्यांची दोन लाखाहून अधिक पदे रिक्त असल्याची माहिती माहे सप्टेंबर, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनात आली असून रिक्त असलेल्या पदांपैकी १ लाख ४१ हजार ३२९ पदे सरळसेवेने तर ५८८६४ पदे पदोन्नतीने भरावयाची आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सरासरी २३ टक्के पदे रिक्त असून काही विभागात हे प्रमाण ३० ते ५० टक्के इतके आहे, सर्वाधिक रिक्त पदे ही गृह विभागात असून सदरहू रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणतीही कार्यवाही करण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, दरवर्षी सेवानिवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांची संख्या ३ टक्के असून मागील सात वर्षापासून कर्मचारी भरती न झाल्याने रिक्त पदाचा आकडा वाढला आहे, रिक्त पदांमुळे प्रशासकीय कामावर ताण येत असून नोकर भरती बंद असल्याने सुशिक्षित बेरोजगार शासकीय नोकरी पासून वंचित राहणार असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने राज्य शासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थाच्या सर्वच विभागातील कर्मचारी भरती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०२३) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे. माहे डिसेंबर, २०२० अखेरच्या उपलब्ध आकडेवारीनुसार शासकीय आणि जिल्हा परिषद कार्यालयांमधील गट अ, ब, क व ड या संवर्गातील सरळसेवेची १,६४,६५१ व पदोन्नतीची ७९,७५४ मिळून २,४४,४०५ इतकी पदे रिक्त आहेत.

तसेच सदर आकडेवारीनुसार सार्वजनिक आरोग्य विभागात २३,११२, शालेय शिक्षण विभागात ३,८२८ व वैद्यकीय शिक्षण विभागात १२,४२३ इतकी पदे रिक्त आहेत.
(३), (४) व (५) पदोन्नतीची रिक्त पदे भरण्यावर कोणतेही निर्बंध नाहीत. तसेच वित्त विभागाच्या दिनांक ३१/१०/२०२२ च्या शासन निर्णयान्वये ज्या विभाग/ कार्यालयांच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतिबंध अंतिम मंजूर झाला आहे अशा विभाग/ कार्यालयांना १०० टक्के व ज्यांचे सुधारीत आकृतिबंध अंतिम झालेले नाहीत अशा विभाग/ कार्यालयाना (वाहन चालक व गड- ड वगळून) सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदांच्या ८० टक्के मर्यादेत पदभरती करण्याची मुभा दिनांक १५/०८/२०२३ पर्यंतच्या कालावधीसाठी देण्यात आली आहे. त्यानुसार रिक्त पदे भरण्याची कार्यवाही संबंधित प्रशासकीय विभागांकडून करण्यात येत आहे. सद्य:स्थितीत पदे रिक्त असली तरीही उपलब्ध कर्मचारी, संगणक आणि ऑनलाईन कामकाज/ बैठका इत्यादींच्या आधारे प्रशासकीय कामकाज करण्यात येत आहे.
(६) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील पोलीस पाटलांची मोठ्या प्रमाणावर गेल्या चार वर्षापासून रिक्त असलेली पदे भरण्याबाबत

**(११) १४२१० (२५-०८-२०२२) श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.कपिल पाटील, श्री.चंद्रशेखर बावनकुळे, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रामदास आंबटकर, श्री.प्रवीण दटके, श्री.रमेशदादा पाटील, श्री.रमेश कराड, श्री.महादेव जानकर, श्री.प्रविण दरेकर, श्री.अरुण लाड : तारांकित प्रश्न क्रमांक १२८५३ ला दिनांक १४ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्याचा महसूल विभाग व पोलीस प्रशासन यांच्यातील महत्वाचा दुवा म्हणून गावांतील घटना व घडामोडीची माहिती वेळोवेळी देण्याचे काम गावपातळीवर पोलीस पाटील करीत आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात एकूण ३८ हजार ७१२ पोलीस पाटलांची मंजूर पदे असून त्यापैकी १२ हजार ४२२ पोलीस पाटलांची पदे गेल्या चार वर्षापासून रिक्त असल्याचे माहे मार्च, २०२२ अखेर वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, पोलीस पाटलांची मोठ्या प्रमाणात पदे रिक्त असल्यामुळे एकाच पोलीस पाटलावर एकाच वेळी तीन ते चार गावांचा प्रभार देण्यात आला असल्यामुळे पोलीस पाटीलांवरील कामाच्या ताणामुळे नागरीकांनाही त्रास सहन करावा लागत असल्याचेही गेल्या चार वर्षापासून ते आजतागायत निदर्शनास येत आहे, हेही खरे आहे काय,

(४) असल्यास, गेल्या चार वर्षापासून रिक्त असलेली सुमारे १२ हजार ४२२ पदे अद्याप न भरण्याची कारणे काय तसेच ही सर्व पदे तातडीने भरण्याच्या दृष्टीने तसेच पोलीस पाटलांना चतुर्थ क्षेणीचा दर्जा देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली आहे वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०२-२०२३) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) दिनांक ३१/१२/२०२१ अखेर राज्यात एकूण ३८६७२ पोलीस पाटलांची मंजूर असून १४६९१ इतकी पदे रिक्त आहेत.

काही गावांमध्ये शासन निर्देशानुसार निश्चित आरक्षणाच्या पदांवर संबंधित प्रवर्गातील उमेदवार उपलब्ध न झाल्याने तसेच नियत वयोमानाने सेवानिवृत्ती, आकस्मिक निधन झाल्याने व राजीनामा यामुळे काही गावांत पोलीस पाटील पद रिक्त असून सदर गावांचा अतिरिक्त कार्यभार शेजारच्या गावातील पोलीस पाटलांकडे देण्यात आलेला आहे.

(४) राज्यातील रिक्त पोलीस पाटील पद भरती करण्याबाबत महसूल व वन विभाग, शासनपत्र दिनांक ०२ ऑगस्ट, २०२२ अन्वये सर्व जिल्हाधिकारी यांना निर्देश देण्यात आले असून, संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून पदभरतीबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात येत आहे.

तसेच पोलीस पाटील हे मानसेवी पद असून त्यांना चतुर्थ श्रेणीचा दर्जा देण्याबाबतची बाब शासनस्तरावर सध्या विचाराधीन नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बोरिवली (मुंबई) पूर्व रेल्वेस्थानक परिसरातील वाहतूक कोंडी दूर करण्याबाबत

**(१२) १४२३७ (२५-०८-२०२२) श्री.सुनिल शिंदे :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बोरिवली (मुंबई) पूर्व रेल्वेस्थानक परिसरात वाहतूक कोंडी होत असल्याने स्थानिक नागरिक त्रस्त झाल्याचे दिनांक २६ एप्रिल, २०२२ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीनुसार बोरिवली पूर्व रेल्वेस्थानक परिसरातील वाहतूक कोंडी दूर करण्याबाबत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०२-२०२३) :** (१) बोरिवली पुर्व रेल्वे स्थानकापासून १०० मीटर अंतरावर रोडचे कॉन्क्रिटीकरणाचे काम चालू असल्याने दिनांक २६/०४/२०२२ रोजीच्या सुमारास वाहतूक कोंडी झाली होती. दहिसर वाहतूक विभागाचे अंमलदार व वॉर्डन यांनी हजर राहून वाहतूक सुरळीत केली.
(२) बोरिवली स्थानक हे जंक्शन असल्यामुळे लांब पल्ल्याच्या गाड्या मोठ्या प्रमाणात स्थानकांमध्ये थांबतात. सदर स्थानकाबाहेर प्रवासी वाहतूकीकरीता रिक्षा, टॅक्सी व इतर वाहनांची वर्दळ चालु असल्याने काही वेळापुरते रेल्वे स्थानकाबाहेर वाहतूक कोंडी होते.

बोरिवली (मुंबई) पूर्व रेल्वे स्थानक परिसरात वाहतूक कोंडी कमी करण्याकरीता दहिसर वाहतूक विभागाने ऑटो रिक्षा व टॅक्सी युनियनशी चर्चा करून त्यांची वाहने योग्य ठिकाणी पार्क करण्याच्या सूचना दिल्या आहेत.

रेल्वे स्थानकामध्ये जाणाऱ्या पादचाऱ्यांना मोकळेपणे जाण्यासाठी रेल्वे स्थानक परिसरात १५० मीटर अंतरावर ना फेरीवाला क्षेत्र करण्यात आले आहे. तसेच सन २०२२ या वर्षात वाहतूकीस अडथळा करणाऱ्या एकूण १३,७३९ रिक्षा व टॅक्सी चालकांवर दंडात्मक कारवाई करण्यात आली आहे.

सदर ठिकाणी वाहतूक सुरळीत राहण्याकरीता बॅरिकेट्स व प्लास्टीक कोन बसविण्यात आले असून ०१ पोलीस अधिकारी, ०२ पोलीस अंमलदार व ०२ ट्रॅफिक वॉर्डन यांची नेमणूक करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील सहशिक्षक पदाचे मानधन वाढविण्याबाबत

**(१३) १४४४० (२५-०८-२०२२) श्री.किशोर दराडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील शासकीय व निमशासकीय शाळेतील नवनियुक्त शिक्षकांना तीन वर्षे सहशिक्षक म्हणून ६०००/-, ७०००/- व ८०००/- इतके मानधन दिले जाते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यात दिनांक १ नोव्हेंबर, २०१६ पासून सर्व शासकीय व निमशासकीय कर्मचारी यांना सातवा वेतन आयोग लागू केल्याने या शिक्षकांनाही मानधन वाढविण्याबाबत मागणी करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सहशिक्षक पदाचे मानधन वाढविणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) शासन निर्णय दिनांक १७/०९/२०११ अनुसार शाळा व महाविद्यालयातील इयत्ता १ ली ते ७ वी इयत्तेतील डी.एड. अर्हताधारक (प्रशिक्षित) यांना रुपये ६०००/-, ८ वी ते १० वी इयत्तेतील पदवी अधिक बी.एड. अर्हताधारक यांना रुपये ८०००/- व उच्च माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातील पदव्युत्तर पदवी (द्वितीय श्रेणी) अधिक बीएड अहर्ताधारक यांना रुपये ९,०००/- इतके मानधन दिले जाते.
(२) होय, हे खरे आहे.
(३) सहायक शिक्षक (परिविक्षाधीन) यांच्या मानधनात वाढ करण्याची मागणी होत असून मानधनात वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील माध्यमिक शाळांमधील शिपाई पदाच्या अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीस मान्यता देण्याबाबत

**(१४) १४९२४ (२५-०८-२०२२) श्री.राजेश राठोड, डॉ.प्रज्ञा सातव, श्री.अभिजित वंजारी : तारांकित प्रश्न क्रमांक १२१८० ला दिनांक २२ मार्च, २०२२ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील माध्यमिक शाळांमधील शिपाई पदाच्या अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीस मान्यता देण्याबाबत सुधारित धोरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सुधारित धोरण तयार करण्यासाठी समिती गठित करण्यात आली आहे काय,
(३) असल्यास, अनुकंपा नियुक्तीबाबत सुधारित धोरण किती कालावधीत लागू करण्याचे नियोजन आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) प्रशासकीय विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन, अनुकंपा नियुक्तीबाबत वित्त व सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने सुधारित धोरण निश्चित करण्याची कार्यवाही शासन स्तरावर सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सिध्देश्वर वाडी (जि.नागपूर) येथील आदिवसी पाड्यात उपासमारीमुळे मृत्यू होत असल्याबाबत

**(१५) १५०८५ (३१-१०-२०२२) श्री.अंबादास दानवे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिध्देश्वर वाडी (जि.नागपूर) येथील आदिवासी पाड्यात उपासमारीमुळे श्री.रमेश ऊईके या व्यक्तीचा मृत्यू झाला असल्याची घटना माहे ऑक्टोबर, २०२२ रोजी वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आदिवासी पाड्यामध्ये गोंड समाजाचे लोक रहात असून त्यांचा मुख्य व्यवसाय लाकूड तोडणे व मजूरी करणे हा असून जवळच्या जंगलात वर्षानुवर्षे लाकूड तोड करुन उदरनिर्वाह करत होता, परंतु अचानकपणे वन विभागाने बंदी केल्यामुळे गोंड आदिवसी समाजापुढे उपासमारी व बेरोजगारी निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, आदिवासी विभागात रोजगाराच्या संधी उपलब्ध होण्यासाठी कोट्यवधी रुपयांचा निधी शासनाकडून खर्च करण्यात येत असून त्याची प्रभावीपणे अंमलबजावणी आदिवासी भागातील अधिकाऱ्यांकडून केली जात नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने आदिवासी भागात रोजगाराच्या संधी उपलब्ध होण्यासाठी योजनांची प्रभावी अंमलबजावणी न करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कारवाई करुन रोजगाराच्या संधी उपलब्ध्ा होण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. विजयकुमार गावीत (१७-०२-२०२३) :** (१) हे खरे नाही. श्री.रमेश ऊईके या व्यक्तीचा मृत्यू आजारपणामुळे झाल्याचे निदर्शनास आले आहे.
(२) हे अंशत: खरे आहे.
(३) हे खरे नाही.
(४) व (५) एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर या कार्यालयामार्फत सन २०२१-२२ करीता केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजनेमधून रुपये ७.०० कोटी निधीच्या योजनांचा आराखडा मंजूर करण्यात आलेला असून नागपूर जिल्ह्यातील लाभार्थ्यांना पात्रतेनूसार लाभ देण्याची कार्यवाही सुरु आहे.

तसेच, चालू वर्षामध्ये आदिवासी विकास आपल्या दारी या कार्यक्रमांतर्गत आधिकारी व आदिवासी समाजाचे समाजसेवक यांनी प्रत्यक्ष भेटी देवून रोजगारासंबंधी राहणीमानाचा दर्जा कसा वाढवावा व त्यांचे हक्क कसे प्राप्त होतील, तसेच शैक्षणिक विकास कसा साधता येईल याबाबत समुपदेश करण्यात आले आहे.

---

## खरवली (ता.महाड, जि.रायगड) गावाच्या हद्दीत राहत असलेल्या एका महिलेने त्यांच्या सहा लहान मुलांना विहिरीत ढकल्यामुळे झालेला मृत्यू

**(१६) १५३८५ (२८-१२-२०२२) श्री.अनिकेत तटकरे :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) खरवली (ता.महाड, जि.रायगड) गावाच्या हद्दीत राहत असलेल्या एका महिलेने त्यांच्या सहा लहान मुलांना विहिरीत ढकल्यामुळे त्या मुलांचा मृत्यू झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने उक्त प्रकरणातील महिलेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०२३) :** (१) व (२) होय.

सदर गुन्हयातील आरोपी महिलेस तिचा नवरा चारित्र्यावरुन संशय घेवून दारु पिऊन त्यांच्या लहान मुलांना व तिला मारहाण करीत असल्याने या त्रासाला कंटाळून आरोपी महिलेने तिच्या लहान सहा मुलांना विहिरीत ढकलून दिले. याबाबत आरोपीविरुध्द महाड औद्योगिक पोलीस ठाणे, जि.रायगड येथे गु.र.नं.७०/२०२२, भा.दं.वि.कलम ३०२ प्रमाणे गुन्हा दाखल करण्यात आला आहे. आरोपीस अटक करण्यात आले असून आरोपी न्यायालयीन कोठडीत आहे. सदर प्रकरणी आरोपीविरूध्द मा.न्यायालयात दोषारोप पत्र दाखल करण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कुंभारमाट (ता.मालवण, जि.सिंधुदूर्ग) येथे शासकीय डी-फार्मसी व बी-फार्मसी महाविद्यालय सुरु करण्याबाबत

**(१७) १६०१० (२८-१२-२०२२) श्री.राजेश राठोड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.अभिजित वंजारी, डॉ.प्रज्ञा सातव, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.जयंत आसगावकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाच्या तंत्र शिक्षण संचालनालयाने दिनांक १६ फेब्रुवारी,२०२२ रोजीचे पत्राद्वारे सिंधुदर्ग जिल्ह्यात शासकीय तंत्रनिकेतन, मालवण परिसरात शासकीय डी फार्मसी व बी फार्मसी महाविद्यालय सुरु करणेबाबतचा विस्तृत प्रकल्प अहवाल (डीपीआर) शासन मान्यतेसाठी सादर केलेला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यास अनुसरुन शासन स्तरावरुन सुरु असलेली कार्यवाही पूर्ण झाली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या प्रकल्पासाठी किती निधीची तरतूद करण्यात आली आहे वा येत आहे,

(४) असल्यास, सदर प्रकल्पाचे काम कधीपासून सुरु करण्यात येणार आहे वा येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहे?

**श्री.चंद्रकांत (दादा) पाटील (२७-०१-२०२३) :** (१) होय.

(२) तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करण्यात आलेल्या प्रकल्प अहवालाच्या (DPR) अनुषंगाने विभागाकडून तपासणी करण्यात येऊन काही मुद्यांबाबतची माहिती तंत्र शिक्षण संचालनालयाकडून मागविण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने संचालनालयामार्फत पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबईत महाराष्ट्र भवनाची उभारणी करण्याबाबत

**(१८) १६०४४ (२८-१२-२०२२) श्री.शशिकांत शिंदे, श्री.अमोल मिटकरी, श्री.विक्रम काळे, श्री.अनिकेत तटकरे, श्री.सचिन अहिर : दिनांक ३० डिसेंबर, २०२२ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक १८ मधील प्रश्न क्रमांक १४८८९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन १९९८ पासून शहर व औद्योगिक विकास महामंडळाने (सिडको) नवी मुंबईतील वाशी येथील आठ हजार चौरस मीटरचा भूखंड महाराष्ट्र भवनाच्या उभारणीसाठी राखीव ठेवला असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नवी मुंबईत अन्य राज्यांची भवन्स दिमाखात उभारण्यात आल्याचे तथापि, महाराष्ट्र भवनासाठी जागा राखीव ठेवलेली असताना महाराष्ट्र राज्याचे भवन अद्याप उभारण्यात आले नसल्यामुळे महाराष्ट्र भवन नवी मुंबईत उभारण्यात यावे अशी मागणी तेथील मा.लोकप्रतिनिधी व नागरीकांनी वारंवार केली असल्याचे निदर्शनास आले आहे, हेही खरे आहे काय,
(३) असल्यास, नवी मुंबईत महाराष्ट्र भवन उभारणीसाठी तत्कालीन मा.उपमुख्यमंत्री तथा वित्तमंत्री यांनी सन २०२२ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात रुपये १०० कोटी रकमेची आर्थिक तरतूद करण्यात आल्याचे घोषित करुन त्याबाबतचा प्रस्ताव सध्या मा.मुख्यमंत्री यांचेकडे प्रलंबित असल्याचे दिनांक ६ ऑक्टोबर, २०२२ रोजी वा त्या सुमारास निदर्शनास आले आहे, हेही खरे आहे काय,
(४) असल्यास, महाराष्ट्र भवन उभारणी प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.रविंद्र चव्हाण (२५-०१-२०२३) :** (१) शहर व औद्योगिक विकास महामंडळाच्या (सिडको) ताब्यातील वाशी, नवी मुंबई येथील सेक्टर-३० अ मधील भूखंड क्र.११ ते १४ येथील एकूण ८३२२.९१ चौ.मी. क्षेत्रफळाचा भूखंड महाराष्ट्र भवनाच्या उभारणीसाठी उपलब्ध करुन देण्याबाबत त्यांच्या संचालक मंडळाच्या दिनांक ०३/०३/२०२० च्या बैठकीत निर्णय झाला आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३) व (४) तत्कालीन मा.उपमुख्यमंत्री तथा वित्तमंत्री यांनी सन २०२२ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात महाराष्ट्र भवन उभारणीसाठी रुपये १०० कोटी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत अर्थसंकल्पीय भाषणात घोषणा केली होती. सिडको प्राधिकरणाकडून नवी मुंबई येथील सेक्टर-३० अ येथील एकूण ८३२२.९१ चौ.मी. जागा सार्वजनिक बांधकाम विभागास वर्ग करण्यात आली आहे. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचेकडून महाराष्ट्र भवनासाठी आवश्यक नकाशे व आराखडे तयार करण्याचे काम प्रगतीत आहे. नकाशे व आराखडे अंतिम केल्यानंतर बांधकामाबाबत पुढील आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

---

## माटुंगा येथील बालगृहात अल्पवयीन मुलांकडून झालेल्या मारहाणीत १६ वर्षीय मुलाचा मृत्यू झाल्याबाबत

**(१९) १६४७२ (२८-१२-२०२२) श्री.राजहंस सिंह :** सन्माननीय **उप मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) माटुंगा येथील बालगृहात अल्पवयीन मुलांकडून झालेल्या मारहाणीत १६ वर्षीय हसवान राजकुमार निषाद या मुलाचा मृत्यू झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सी.सी.टीव्हीवर मारहाण झाल्याचे निदर्शनास आले असून आरोपी असलेले चारही मुलांनी उक्त गुन्हयाची कबुली दिली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने आरोपींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-०२-२०२३) :** (१), (२), व (३) माटुंगा येथील डेविड ससून बालगृहामधील १६ वर्षीय हसवान राजकुमार निषाद याचा इतर मुलांनी केलेल्या मारहाणीत मृत्यू झाल्याबाबत दिलेल्या फिर्यादीनुसार शिवाजी पार्क पोलीस ठाणे, मुंबई येथे गु.र.क्र.५११/२०२२, भा. दं. वि. कलम ३०२, १४३, ३४ अन्वये गुन्हा नोंद करण्यात आला आहे.

सदर प्रकरणी दोन आरोपींविरूध्द मा.न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करण्यात आले आहे. तसेच चार विधीसंघर्षग्रस्त बालकांविरूध्द मा.बाल न्यायमंडळ, डोंगरी, मुंबई येथे अंतिम अहवाल सादर करण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अनुदानित तसेच शासकीय शाळांतील शिक्षकांना अशैक्षणिक कामातून मुक्त करण्याबाबत

**(२०) ४९३३५ (२९-०८-२०१९) श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात इतर मंडळाच्या शिक्षकांवर कोणत्याही प्रकारच्या अशैक्षणिक कामाची जबाबदारी नसल्याने ते पूर्णवेळ अध्ययनाचे काम करीत असतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अनुदानित तसेच शासकीय शाळांमधील शिक्षकांवर इतर अशैक्षणिक कामांची जबाबदारी असल्याने हे शिक्षक पूर्णवेळ अध्ययनाचे काम करू शकत नाहीत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अनुदानित तसेच शासकीय शाळांतील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान टाळण्यासाठी या शाळांतील शिक्षकांना अशैक्षणिक कामातून मुक्त करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिपक केसरकर (१९-०१-२०२३) :** (१) होय हे खरे आहे.
(२) व (३) शासन परिपत्रक दिनांक १८/०६/२०१० अन्वये शाळेत पदस्थापित केलेला कोणताही शिक्षक इतर कोणत्याही शाळ/कार्यालयात काम देण्यात येणार नाही तसेच त्यास दशवार्षिक जनगणना, आपत्ती निवारणाचे काम किंवा स्थानिक प्राधिकरण, राज्य विधानसभा व लोकसभा निवडणुकांच्या कर्तव्याखेरीज इतर कोणतेही शिक्षणेत्तर काम देण्यात येणार नाही, असे आदेश दिले आहेत.

तसेच शासन परिपत्रक दिनांक ०३/०५/२०१३ नुसार शाळाबाह्य कामाकरीता शिक्षकांच्या सेवा वापरण्यात येऊ नये व इतर कार्यालयात प्रतिनियुक्तीने किंवा तात्पुरत्या स्वरुपात कार्यरत असणाऱ्या शिक्षकांच्या सेवा रद्द करुन नियुक्तीच्या शाळेवर वर्ग करण्यात याव्यात, असे निर्देश संबंधितांना देण्यात आले आहेत.

आपत्ती व्यवस्थापन अधिनियमांतर्गत कोविड-१९ मुळे उद्भवलेल्या संवर्गजन्य रोगाचा प्रतिबंध व नियंत्रण याकरीता शिक्षकांच्या सेवा कोरोना योध्दा म्हणून घेण्यात आल्या होत्या. परंतु सदरची साथ नियंत्रणात आल्यानंतर व शासनाच्या निर्देशानुसार शाळा सुरु झाल्यामुळे शिक्षकांना सदरच्या सेवेतून कार्यमुक्त केले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**राजेन्द्र भागवत**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.